पुलवामा येथील शहिद झालेल्या सैनिकांच्या नातेवाईकांना स्वेच्छा मदत देणेबाबत**.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-५०१९/प्र.क्र.१७४/आस्था-७**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई-४००००१.

दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०१९

# शासन परिपत्रक

संदर्भ :- शासन पत्र क्र.संकीर्ण-५०१९/प्रक्र.१७४/आस्था-७, दि.१८ फेब्रुवारी, २०१९

**शासन परिपत्रक :--**

जम्मु काश्मिर मधील पुलवामा येथे अतिरेक्यांच्या हल्ल्यात शहिद झालेल्या सैनिकांच्या नातेवाईकांना स्वेच्छा मदत करण्यात यावी असा विचार सर्व स्तरावरुन होत आहे. या संदर्भात मा.मंत्री, (ग्रा.वि.वि) यांनी राज्यातील जिल्हा परिषदेच्या वर्ग-३, वर्ग-४ मधील सर्व संवर्गातील कर्मचा-यांच्या संघटनांच्या (Union) पदाधिका-यांच्या समवेत बुधवार, दिनांक २०/२/२०१९ रोजी बैठक घेतली. त्या बैठकीत सर्व संघटनेच्या पदाधिका-यांने अश्या प्रकारे राज्यातील जिल्हा परिषदेतील वर्ग-३, वर्ग-४ संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या वेतनातुन कमीतकमी १००/- कपात करण्यास मान्यता दिली, अशी कपात करण्यात आलेल्या एकत्रित रकमेचा धनादेश **" भारत के वीर "** या नावाने काढुन तो धनादेश मा.मंत्री (ग्रा.वि.वि) यांचेकडे सुपूर्द करण्याबाबत राज्यातील सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सुचित करण्यात येत आहे. एखादया कर्मचा-याची कपातीबद्दल तक्रार असेल, त्यानी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (साप्रवि), यांचेकडे याबद्दल अर्ज करावा व अश्या कर्मचा-याची रक्कम कपात करण्यात येवु नये.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३०१५०६०९९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyadarshan S Kamble

Digitally signed by Priyadarshan S Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f18890edb030995db4323c71a3bdecddde94daa5425bbe713b2e2a5b7d6fa779, cn=Priyadarshan S Kamble
Date: 2019.02.21 16:23:09 +05'30'

( प्रि.शं.कांबळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (ग्रा.वि) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि) यांचे खाजगी सचिव
५) मा.अध्यक्ष, पंचायत राज समिती, विधानभवन
६) मा.विधानसभा /मा.विधान परिषद सदस्य (सर्व)
७) मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
८) मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
९) विभागीय आयुक्त (सर्व).
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
११) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्रवि),जिल्हा परिषद (सर्व)
१२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी ,जिल्हा परिषद (सर्व)
१३) निवड नस्ती, कार्यासन आस्था-७, ग्राम विकास विभाग,मंत्रालय ,मुंबई